नवेगाव नागझिरा आणि मेळघाट या दोन व्याघ्र प्रकल्पांतर्गत विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करण्यासाठी एकूण २२४ पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०२१४/ प्र.क्र.४१/फ-१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २२ एप्रिल, २०१५

**वाचा :-**
१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२२(४)/आस्था/प्र.क्र.२४६/५०१०/२१३-१४, दिनांक ०४.०२.२०१४
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष -२२(४)/आस्था/प्र.क्र.२४६/२१००/१४-१५, दिनांक १०.०९.२०१४.
३. शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी-१०.०९/प्र.क्र.१९३/फ-१, दिनांक १२.०४.२०१२.
४. शासन निर्णय क्रमांक एफएसटी ०७/१३/प्र.क्र.३२५/फ-४, दिनांक २८.११.२०१३.
५. शासन निर्णय क्रमांक एफएसटी ०७/१३/प्र.क्र.३२५/फ-४, दिनांक २८.०५.२०१४.
६. केंद्र शासनाचे पत्र क्रमांक १५-५/२००८-NTCA (Pt-III), दिनांक ०६.०८.२०१४.

**प्रस्तावना :-**

बदलत्या परिस्थितीमध्ये वाघ ही दुर्मिळ प्रजाती संकटग्रस्त अवस्थेत असून नामशेष होण्याच्या मार्गावर असल्याने वाघांचे संरक्षण व संवर्धन करणे अत्यंत आवश्यक आहे. सदर उद्देशाने राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकारणाने राज्य शासना सोबत एक MoU देखील केलेला आहे. सबब, राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरणाने (NTCA) राज्यातील ताडोबा-अंधारी आणि पेंच व्याघ्र प्रकल्पांतर्गत स्पेशल टायगर प्रोटेक्शन फोर्स (STPF) निर्माण करणे, शस्त्रसज्ज करणे आणि कामावर तैनात करणे हयासाठी मार्गदर्शक सूचना आणि करारनाम्याचा मसुदा तयार केला आहे. हा करारनामा विचारात घेऊन ताडोबा अंधारी आणि पेंच या दोन व्याघ्र प्रकल्पांतर्गत विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना दिनांक १२.०४.२०१२, दिनांक २८.११.२०१३ व दिनांक २८.०५.२०१४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये करण्यात आली आहे. ताडोबा-अंधारी आणि पेंच व्याघ्र प्रकल्पात निर्माण केलेल्या विशेष व्याघ्र संरक्षण दला (STPF) प्रमाणेच नवेगाव नागझिरा आणि मेळघाट या दोन व्याघ्र प्रकल्पांसाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करणे आवश्यक आहे. केंद्र शासनाने दिनांक ०६.०८.२०१४ रोजीच्या पत्रान्वये नवेगाव नागझिरा आणि मेळघाट या दोन व्याघ्र प्रकल्पांतर्गत विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करण्यास तत्वत: मान्यता प्रदान केली आहे. सबब, प्रत्येक व्याघ्र प्रकल्पास ११२ पदे याप्रमाणे दोन व्याघ्र प्रकल्पांकरीता एकूण २२४ पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीच्या

मान्यतेसाठी चक्रिय पध्दतीने सादर केला असता, समितीने दिनांक ०८.०४.२०१५ रोजी विधीवत मंजूरी दिली आहे.

**शासन निर्णय :-**

उच्चस्तरीय सचिव समितीने दि. ०८.०४.२०१५ रोजी दिलेली मंजूरी आणि विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करण्याची आवश्यकता विचारात घेऊन वर्ष २०१५-१६ पासून नवेगाव नागझिरा आणि मेळघाट व्याघ्र प्रकल्पामध्ये प्रत्येकी एक याप्रमाणे दोन विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (Special Tiger Protection Force) निर्मिती करण्यात येत आहे. प्रत्येक दलामध्ये सहाय्यक वनसंरक्षक या दर्जाचा एक प्रमुख अधिकारी व त्याच्या अधिनस्त ३ वनपरिक्षेत्र अधिकारी, ८१ वनरक्षक व २७ वन निरीक्षक (Forest Watchers) अशी एकूण ११२ याप्रमाणे एकूण २२४ पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर पदे खाली दर्शविलेल्या वेतनश्रेणीनुसार असतील :-

| अ.क्र. | पदाचे नाव | संख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | सहाय्यक वनसंरक्षक | २ | रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु. ५०००/- |
| २ | वनपरिक्षेत्र अधिकारी | ६ | रु.९३००-३४८०० + ग्रेड पे रु.४४००/- |
| ३ | वनरक्षक | १६२ | रु.५२००-२०२०० + ग्रेड पे रु.१८००/- |
| ४ | वन निरीक्षक (Forest Watchers) | ५४ | रु.५२००-२०२०० + ग्रेड पे रु.१८०० /- |
| **एकूण पदे** | | **२२४** | |

२. वनरक्षक व वन निरीक्षक (Forest Watchers) पदाव्यतिरिक्त इतर पदे उपलब्ध कर्मचारी / अधिकाऱ्यांमधून व STPF संदर्भात केंद्र शासनासोबत झालेल्या समझोता कराराच्या तरतुदीनुसार भरण्यात यावीत.

३. वनरक्षक पदांच्या भरतीबाबतीत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही व्हावी. तसेच पदाच्या भरतीबाबत वन निरीक्षक पदासाठी संदर्भीय शासन निर्णय ४ व ५ प्रमाणे कार्यवाही करावी.

४. या पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च १०० टक्के केंद्रपुरस्कृत योजनेमध्ये उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय दिनांक ०८.०४.२०१५ रोजी मा. मुख्य सचिव हयांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने चक्रिय पध्दतीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. या पदांवर नियमानुसार भर्ती केलेल्या कार्यरत कर्मचाऱ्यांना केंद्र शासनाकडून वित्तीय सहाय्य बंद झाल्यावर वन विभागात उपलब्ध रिक्त पदांवर समाविष्ट करण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२२१३३४२७१२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.04.22 13:46:49 +05'30'

**( डॉ. यु.एम.फारुकी )**

सह सचिव (वने)

महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक/ दुय्यम संवर्ग ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
१०.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
११.वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, नवेगाव नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
१२.सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) / सर्व मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव)
१३.मुख्य वन संरक्षक (मंत्रालय)
१४.सर्व सह सचिव (वने), वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५.मा.मंत्री (वने) यांचे स्वीय सहाय्यक.
१६.कक्ष अधिकारी (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७.कक्ष अधिकारी (विसु-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१९.फ-२/फ-४/फ-८ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२०.निवडनस्ती फ-१.